“Bore well /dug well with solar pump (५ hp) for irrigation of land given under FRA २००६” या योजनेच्या मार्गदर्शक सुचनांना मंजूरी देणेबाबत.

**महाराष्ट्र शासन**
**आदिवासी विकास विभाग**
**शासन निर्णय क्रमांकः केंद्रीय-२०२१/प्र.क्र. ३३ /का-१९**
मंत्रालय, मुंबई ४०० ०३२
तारीख: ०७/०४/२०२२

**संदर्भ-**

१. आदिवासी विकास विभाग, शासन निर्णय क्र.केंद्रीय-२०१५/प्र.क्र. ६३/का-१९ दि. २६.०८.२०२१.
२. आयुक्त, आदिवासी विकास नाशिक यांचे पत्र क्रमांक विकेस २०१५/प्र.क्र.५१/का.८(५) दि.२३.११.२०२१ व दि. १.१२.२०२१

**प्रस्तावना-**

आदिवासी विकास विभागामार्फत आदिवासी समाजाच्या विकासासाठी विविध कल्याणकारी योजना राबविण्यात येतात. आदिवासी जमातीतील शेतक-यांना सिंचनाच्या सुविधा पुरवुन शाश्वत कृषी उत्पन्नवाढीचा लाभ देणे व त्यामार्फ़त त्यांच्या जीवनमानाचा दर्जा उंचावणे या उद्देशाने वनहक्क कायदा २००६ अंतर्गत वनपट्टे मिळालेल्या अनुसूचीत जमातीच्या लाभार्थ्यांच्या शेतीच्या उत्पन्नात वाढ होण्याच्या दृष्टीने तसेच शेतीला पाणी पुरवठा करण्याकरीता विहीर/बोअरवेल करणे, वनपट्टे धारकांच्या शेतीत सोलारपंप बसवुन त्यांच्या उत्पन्नात वाढ होण्याच्या दृष्टीकोनातुन Bore well /dug well with solar pump (५ hp) for irrigation of land given under FRA २००६ ह्या योजनेच्या मार्गदर्शक सुचना संदर्भाधिन क्र.१ वरील शासन निर्णयान्वये निर्गमित करणेत आल्या होत्या. तथापि, योजना अंमलबजावणी ही राज्यस्तरावरुन व्हावी तसेच लाभार्थ्याला देणेत येणारे विहीर अनुदान हे नियोजन विभाग व सोलार पंप व पॅनेल अनुदान हे उर्जा विभाग यांच्या प्रचलित शासन निर्णयानुसार सुधारीत करणेची विनंती संदर्भ २ येथील पत्रान्वये करणेत आली आहे. सदर विनंतीच्या अनुषंगाने प्रस्तुत प्रकरणी संदर्भ १ येथील शासन निर्णयान्वये निर्गमित करणेत आलेल्या मार्गदर्शक सुचना अधिक्रमित करुन सुधारित मार्गदर्शक सुचना निर्गमित करण्याची बाब शासनाच्या विचाराधिन होती.

**शासन निर्णय-**

वनहक्क कायद्यातंर्गत वनपट्टे मिळालेल्या अनुसूचीत जमातीच्या लाभार्थ्यांना शेतीला पाणी पुरवठा करण्याकरीता विहीरींची निर्मिती करणे, वनपट्टे धारकांच्या शेतीत सोलारपंप बसवुन त्यांच्या उत्पन्नात वाढ होण्याच्या दृष्टीकोनातुन Bore well /dug well with solar pump (५ hp) for irrigation of land given under FRA २००६ ही सन २०१५-१६ मध्ये विशेष केंद्रिय सहाय्य अंतर्गत रु. १८००.०० लक्ष किंमतीची मंजुर योजना राबविण्यासाठी दि. २६.०८.२०२१ रोजीच्या शासन निर्णयासोबतचे परिशिष्ट १ अन्वये देणेत आलेल्या मार्गदर्शक सुचना अधिक्रमित करुन सुधारित मार्गदर्शक सुचनांना सोबत जोडलेल्या परिशिष्ट क्रमांक १ नुसार मंजूरी प्रदान करण्यात येत आहे.

२.      सदर योजनेच्या मार्गदर्शक सूचनांनुसार वितरीत तरतूदींच्या मर्यादेत योजना राबविण्याबाबत त्वरीत कार्यवाही आयुक्त, आदिवासी विकास ,नाशिक यांनी करावी व त्याचे उपयोगिता प्रमाणपत्र आर्थिक व भौतिक अहवालासह शासनास सादर करण्याची दक्षता घ्यावी.

३.      हा शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०२२०४०७१८११२८५३२४ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

Prakash Vijay Waje

Digitally signed by Prakash Vijay Waje
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=TRIBAL DEVELOPMENT DEPARTMENT, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=1b4b695a8c26d140fc5c049d281eedbf23beed9a89ad7526416132cf28f14776, pseudonym=23F17B7ABBFC6358B3073C61D025B7893A825E98, serialNumber=400892E5E82479E4F3C8CF46538DC917B7071E979796D37178D3B709E19155AB, cn=Prakash Vijay Waje
Date: 2022.04.07 18:12:15 +05'30'

**( प्रकाश वि. वाजे )**
**कार्यासन अधिकारी, महाराष्ट्र शासन**

**प्रत,**

१. मा.मंत्री आदिवासी विकास, महाराष्ट्र राज्य, यांचे खाजगी सचिव ,मंत्रालय,मुंबई
२. मा.राज्यमंत्री आदिवासी विकास, महाराष्ट्र राज्य, यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई
३. मा. सचिव,आदिवासी विकास, यांचे स्वीय सहायक,मंत्रालय,मुंबई
४. आयुक्त,आदिवासी विकास,महाराष्ट्र राज्य,नाशिक.
५. आयुक्त, आदिवासी संशोधन व प्रशिक्षण संस्था, पुणे
६. सहसचिव,आदिवासी विकास विभाग,मंत्रालय,मुंबई.
७. उपसचिव, आदिवासी विकास विभाग, मंत्रालय, मुंबई.
८. सर्व अपर आयुक्त, आदिवासी विकास.
९. सर्व प्रकल्प अधिकारी, आदिवासी विकास.
१०. जिल्हा अधीक्षक,कृषी अधिकारी, नाशिक.
११. जिल्हा भूजल सर्वेक्षण अधिकारी, नाशिक.
१२. संचालक, मेडा.
१३. संगणक समन्वयक,आदिवासी विकास विभाग,मंत्रालय,मुंबई
१४. निवड नस्ती (का.१९) आदिवासी विकास विभाग,मंत्रालय,मुंबई.

## परिशिष्ट- १

| | | |
|---|---|---|
| १ | योजनेचे नाव | • Bore well /dug well with solar pump (५ hp) for irrigation of land given under FRA २००६ |
| २ | योजनेचा उद्देश/ हेतु | • वनहक्क कायदा अंतर्गत वनपट्टे मिळालेल्या अनुसूचीत जमातीच्या लाभार्थ्यांना शेतीच्या उत्पन्नात वाढ होण्याच्या दृष्टीने शेतीला पाणीपुरवठा करण्याकरीता विहीर करणे व सोलार पंप बसविणे. |
| ३ | एकुण मंजूर निधी / वित्तीय तरतूद | • विशेष केंद्रिय सहाय्य अंतर्गत सन २०१५-१६ करिता मंजुर रु. १८००.०० लक्ष |
| ४ | योजना कालावधी | • १ वर्ष |
| ५ | योजनेचे कार्यक्षेत्र | • संपुर्ण राज्य. |
| ६ | योजनेतील लाभार्थी | • आयुक्त, आदिवासी विकास, नाशिक यांचेकडुन प्रकल्प कार्यालयनिहाय (वनपट्टे वाटप झालेल्या प्रकल्पांतर्गत) लक्षांक निश्चित करणेत येतील. |
| ७ | खर्चाचे अंदाजपत्रक | • बाबनिहाय प्रति लाभार्थी अनुदानाची मर्यादा खालीलप्रमाणे असेल.<br>अ.क्रं. योजनेची बाब — एकुण रक्कम<br>०१ विहीर — ३,००,०००/-<br>०२ सोलार पंप, पॅनल (५ HP) — ३,२५,०००/-<br>• उपरोक्त नमुद बाबींकरीता ठरविण्यात आलेली अनुदानाची मर्यादा ही शासनाच्या धोरणाप्रमाणे ठरविण्यात आलेली महत्तम मर्यादा आहे. योजनेचा प्रत्यक्ष लाभ देण्याच्या अनुषंगाने प्रती लाभार्थी कमी खर्च येत असेल तर त्याप्रमाणे अनुदान अदा करणेत येईल व शिल्लक निधीच्या प्रमाणात लक्षांकात वाढ करण्याचे अधिकार मुल्यमापन व संनियंत्रण समितीस असतील. |
| ८ | योजना अंमलबजावणी यंत्रणा | • विहीरींकरिता सबंधित प्रकल्प अधिकारी, एकात्मिक आदिवासी विकास प्रकल्प व कृषी विभाग/ भूजल सर्वेक्षण आणि विकास यंत्रणा / ग्रामिण पाणी पुरवठा/इतर शासकीय यंत्रणा<br>• सोलार पंप करिता सोलार पंप, पॅनेल (५HP) ची खरेदी विहीत पद्धतीने आयुक्तालयाचे स्तरावरून करण्यात यावी. |
| ९ | नियंत्रण अधिकारी | • आयुक्त, आदिवासी विकास, नाशिक . |
| १० | निधी वितरण कार्यपद्धती- | • आयुक्त, आदिवासी विकास, नाशिक हे संबंधित प्रकल्प अधिकारी यांना विहीर अनुदानाकरिता निधीचे वाटप करतील.<br>• प्रकल्प अधिकारी संबंधित अंमलबजावणी यंत्रणेला टप्पेनिहाय निधी वितरित करतील. |
| ११ | योजना राबविण्याची कार्यपध्दती | • योजनेच्या अंमलबजावणीकरीता आयुक्त, आ.वि. यांच्या स्तरावर खालीलप्रमाणे मुल्यमापन व संनियंत्रण समितीचे गठन करणेत येईल.<br>• आयुक्त, आदिवासी विकास, नाशिक - अध्यक्ष<br>• सर्व अपर आयुक्त, आदिवासी विकास - सदस्य |

| | | |
|---|---|---|
| | | • प्रकल्प अधिकारी, कोणतेही चार- सदस्य<br>• जिल्हा अधिक्षक कृषी अधिकारी, नाशिक- सदस्य<br>• जिल्हा भूजल सर्वेक्षण अधिकारी, नाशिक- सदस्य<br>• प्रतिनिधी, मेडा- सदस्य<br>• सहायक आयुक्त (मुख्यालय), केंद्रीय योजना- सदस्य सचिव<br>• संनियंत्रण समितीने ठरविल्याप्रमाणे योजनेची अंमलबजावणी करण्याकरीता अंमलबजावणी यंत्रणेची निवड विहित पद्धतीने आयुक्त कार्यालयाकडुन करणेत यावी.<br>• सोलार पंप पॅनेल- सदर बाब उद्योग उर्जा विभागाच्या शासन निर्णय क्रमांक:-सौरप्र-२०१८/प्र.क्र.४०१/ऊर्जा-७ दिनांक १५/११/२०१८ रोजीच्या शासन निर्णयामधील तरतुदींच्या आधारे राबविण्यात येईल.<br>• लाभार्थी निवड - कार्यपद्धती संनियंत्रन व मुल्यमापन समितीकडुन ठरविण्यात येईल.लाभार्थी निवड देखील मुल्यमापन व सनियंत्रण समितीकडून करण्यात येईल व अंतिम यादीस शासनाची मान्यता घेण्यात येईल.<br>• योजनेचा लाभ देण्यासाठी इच्छुक वनपट्टेधारक शेतक-यांसाठी पात्रतेचे निकष सदर समितीकडुन ठरविण्यात येतील. रहिवासी दाखला, जातीचा दाखला, वनहक्क कायद्याद्वारे वनपट्टा प्राप्त झाल्याचे प्रमाणपत्र, सोलार पंप देणे प्रस्तावित आहे त्या लाभार्थ्यांकडे जलस्त्रोत उपलब्ध असल्याचा दाखला, यापूर्वी सदर योजनेचा लाभ आदिवासी विकास अथवा अन्य विभागामार्फत घेतला नसल्याबाबत प्रमाणपत्र, विहीर प्रस्तावित असलेल्या ठिकाणी पाण्याची उपलब्धता असल्याचे भुजल सर्व्हेक्षण यंत्रणेचे प्रमाणपत्र, किमान जमीन क्षेत्र इ. बाबींचा त्यामध्ये समावेश करणेत येईल.<br>• आयुक्त आदिवासी विकास ह्यांच्याकडुन प्रकल्प कार्यालय निहाय लक्षांक देण्यात येईल. सदर लाभार्थ्यांच्या मध्ये विधवा महिला शेतकरी, अपंग शेतकरी यांना प्राधान्य देण्याबाबत समिती निर्णय घेईल.<br>• प्रकल्प अधिकारी हे स्थानिक वर्तमानपत्रात जाहिरात प्रसिद्ध करून लाभार्थ्याचे अर्ज प्राप्त करुन घेतील.<br>• प्रकल्प कार्यालयामार्फ़त प्राप्त अर्जांची छाननी करणेत येईल. याकरीता प्रकल्प कार्यालयस्तरावर पुढीलप्रमाणे समितीचे गठण करणेत येईल.<br>१. प्रकल्प अधिकारी, एकात्मिक आदिवासी विकास प्रकल्प - अध्यक्ष<br>२. वरिष्ठ भु वैज्ञानिक, भूजल सर्वेक्षण व विकास यंत्रणा - सदस्य<br>३. प्रकल्प कार्यालय कार्यक्षेत्राशी संबंधित कार्यकारी अभियंता, महाराष्ट्र राज्य विद्युत महामंडळ - सदस्य<br>४. सहाय्यक लेखाधिकारी - सदस्य<br>५. सहाय्यक प्रकल्प अधिकारी - सदस्य सचिव<br>• छाननीअंती लक्षांकापेक्षा जास्त अर्ज प्राप्त असतील तर लॅाटरी पद्धतीद्वारे पात्र लाभार्थ्यंची अंतिम निवड करणेत येईल. |

| | | |
|---|---|---|
| | | • योजनेसाठी मंजुर लक्षांकाप्रमाणे पात्र लाभार्थी न मिळाल्यास लक्षांक वर्ग करणे अथवा कमी करण्याबाबतचे अधिकार आयुक्त, आदिवासी विकास,नाशिक यांना राहतील. योजनेच्या अंमलबजावणीसंदर्भात धोरणात्मक बाब उद्भवल्यास शासनाचे मार्गदर्शन घेण्यात यावे. |
| १२ | मुल्यमापन व संनियंत्रण | • योजनेच्या सनियंत्रण व मुल्यमापन करण्याची कार्यपद्धती समितीकडुन निश्चित करणेत येईल. तथापि तीन महिन्यातुन एकदा योजनेचा आढावा घेण्यात यावा.<br>• लाभार्थ्याकडुन विहीरीची निर्मिती झाल्याचा, सोलर पंप बसविण्यात आल्याचे व ते कार्यरत असल्याचा अहवाल प्रकल्प कार्यालये, आयुक्त आदिवासी विकास नाशिक यांच्यामार्फ़त शासनाकडे सादर करतील. |
| १३ | योजनेची फलनिष्पती | • वनहक्क कायदा अंतर्गत वनपट्टे मिळालेल्या अनुसूचीत जमातीचे लाभार्थी शेतामध्ये विहीरींच्या माध्यमातुन जलसंचनाची सुविधा निर्माण होणे व सोलार पंपच्या माध्यमातुन शेतीला पाणी पुरवठा करु शकतील व त्याआधारे उत्पन्नाच्या शाश्वत मार्गाद्वारे जीवनमानाचा दर्जा उंचावतील. |